२०१६-२०१७ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने
६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना देण्यात यावयाच्या
अनुदानाचे वाटप. मागणी क्र. एल ३ , २४१५ - (०३) (०२)
मुख्य लेखाशिर्ष-२४१५ ०६२४.
(तिसरा हप्ता) (माहे जानेवारी ते मार्च,२०१७)

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०१६/प्र.क्र.७६/योजना-४**
बांधकाम भवन, तळ मजला, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०९ मार्च,२०१७

वाचा -

१)शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/ प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.

२)शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८

३) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.

४) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- अनुग्रा २०१६/प्र.क्र.७६ /योजना-४ , दि. २८.०४.२०१६.

५) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- अनुग्रा २०१६/प्र.क्र.७६ /योजना-४ , दि. २७.०७.२०१६.

## शासन निर्णय :-

सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाकरीता मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. एल ३ "२४१५ - (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, संकेतांक क्रमांक २४१५ ०६२४" ३१ सहायक अनुदान (वेतनेतर), ३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली ६ शासकीय ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी (जि. पुणे), कसबाबावडा, (जि.कोल्हापूर), जालना, परभणी, बुलढाणा व सिंदेवाही (जि. चंद्रपूर) यांना

वेतनेतरकरिता रु. ६०.०० लक्ष (रु. साठ लक्ष)व वेतनासाठी रु.४५५.८० लक्ष (रु.चारशे पंच्चावन्न, लक्ष ऐंशी हजार) असे रु.५१५.८० लक्ष (रु.पाचशे पंधरा लक्ष ऐंशी हजार) इतकी तरतूद अर्थसंकल्पित केली आहे.

२. माहे एप्रिल ते मे,२०१६ या कालावधीकरीता शासन तरतूदीनुसार वेतनेतरसाठी रु.१०.०० लक्ष (रु.दहा लक्ष)व वेतनासाठी रु.५२.८० लक्ष (रु.बावन्न लक्ष, ऐंशी हजार)असे एकूण रु.६२.८० लक्ष (रु.बासष्ट लक्ष, ऐंशी हजार) इतक्या रकमेचे अनुदान शासन निर्णय दि. २८ एप्रिल, २०१६ अन्वये वितरीत करण्यात आला आहे. तसेच माहे जून ते डिसेंबर,२०१६ या कालावधीसाठी वेतनेतरकरिता अर्थसंकल्पिय तरतूदीप्रमाणे रुपये ३०.०० लक्ष (तीस लक्ष) व वेतनासाठी त्यांनी मागणी केल्याप्रमाणे रुपये २००.२० लक्ष (रु.दोनशे लक्ष, वीस हजार)असे एकूण रुपये २३०.२० लक्ष (रु.दोनशे तीस लक्ष, वीस हजार)इतके अनुदान ६ शासकीय ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र यांना दि.२७ जुलै,२०१६ च्या शासन निर्णयान्वये दुसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यात आला आहे.

३. आता माहे जानेवारी ते मार्च,२०१७ या कालावधीसाठी ६ शासकीय ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र यांना वेतनेतरकरिता अर्थसंकल्पिय तरतूदीप्रमाणे रुपये १४.०० लक्ष (चौदा लक्ष) व वेतनासाठी त्यांनी मागणी केल्याप्रमाणे रुपये ९२.०८ लक्ष (रु.ब्यान्नव लक्ष, आठ हजार) असे एकूण रुपये १०६.०८ लक्ष (रु.एकशे सहा लक्ष, आठ हजार)इतके अनुदान या शासन निर्णयान्वये तिसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर अनुदान विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यात येत आहे. सदर तरतूद सर्व संबंधित विभागीय आयुक्त यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

५. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण ११९८/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि. १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था) यांनी सदर संस्थेस अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

६. हा खर्च मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण" (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र संकेतांक क्र. (२४१५ ०६२४) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) व ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षातंर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे, त्याबाबतचा ताळमेळ घेऊन त्याबाबत खातरजमा करुन शासनास कळविण्याबाबत विभागीय आयुक्तांनी संबंधितांना सूचना द्याव्यात.

७. विभागीय आयुक्त कार्यालयाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. मात्र सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच ग्रामसवेक प्रशिक्षण केंद्रांनी वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे. याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्रांच्या प्राचार्यांची असेल.

८. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्यत-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत/ सुविधा पुरवतील.

९. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि. ०८ फेब्रुवारी,२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०९१०३७२६३०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Mahadev Gengaje

Digitally signed by Rajendra Mahadev Gengaje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aadac6f62a04dc76f59a0a873d1263c7d14f6ea5080bb750bf392303a1a35907, cn=Rajendra Mahadev Gengaje
Date: 2017.03.09 11:38:20 +05'30'

( रा. म. गेंगजे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, पुणे, नागपूर, अमरावती, औरंगाबाद (प्रत्येकी२ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था) विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे, नागपूर, अमरावती, औरंगाबाद.

३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, कोल्हापूर, बुलढाणा, जालना, परभणी, चंद्रपूर
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. उपमहासंचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा) बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थसं-१७/व्यय-१५
९.प्राचार्य,ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म, पुणे/कसबा बावडा, कोल्हापूर जालना/ परभणी/ सिंदेवाही / चंद्रपूर/बुलढाणा
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, वित्त-८ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतींसह)
११. निवड नस्ती का. क्र. योजना-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.अनुग्रा-२०१६/प्र.क्र.७६/योजना-४,दि.०९मार्च, २०१७ | | | | |
|---|---|---|---|---|
| जानेवारी,२०१७ ते मार्च,२०१७ या कालावधीतील तिसऱ्या हप्त्याचे वितरण (रु. लक्षात) | | | | |
| अ.क्र. | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतनेतर | वेतन | एकूण |
| १ | मांजरी फार्म, पुणे | २.८० | २०.३० | २३.१० |
| २ | कसबा बावडा, कोल्हापूर | ०.०० | १२.६० | १२.६० |
| **अ** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **२.८०** | **३२.९०** | **३५.७०** |
| ३ | जालना | २.८० | २६.७२ | २९.५२ |
| ४ | परभणी | २.८० | १५.७९ | १८.५९ |
| **ब** | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** | **५.६०** | **४२.५१** | **४८.११** |
| ५ | सिंदेवाही, चंद्रपूर | २.८० | १५.६७ | १८.४७ |
| **क** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **२.८०** | **१५.६७** | **१८.४७** |
| ६ | बुलढाणा | २.८० | १.०० | ३.८० |
| **ड** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **२.८०** | **१.००** | **३.८०** |
| | **एकूण (अ+ब+क+ड)** | **१४.००** | **९२.०८** | **१०६.०८** |